सामान्य प्रशासन विभागाच्या अधिपत्याखालील चारही आहार/उपाहारगृहांच्या कार्यन्वियतेसाठी लागणारा कच्चा माल व वस्तु इत्यादीचा पुरवठा करण्यासाठी मुदतवाढ देणेबाबत...

**महाराष्ट्र शासन**
**सामान्य प्रशासन विभाग (उपाहारगृहे)**
**शासन निर्णय क्रमांक : संकीर्ण-२०१७/प्र.क्र.१४४/१७/मंउका,**
मादाम कामा मार्ग, हुतात्मा राजगुरु चौक,
मंत्रालय, मुंबई - ४०० ०३२.
दिनांक : ०२ जून, २०१७

**संदर्भ :**

१) शासन निर्णय, उद्योग, उर्जा व कामगार विभाग क्रमांक:भाखंस-२०१४/प्र.क्र.८२/भाग-III/ उद्योग-४, दि.३०.१०.२०१५

२) शासन निर्णय क्रमांक:निविदा-२०१६/प्र.क्र.४४/१६/मंउका (१), दि.१०.०६.२०१६

**प्रस्तावना :**

सामान्य प्रशासन विभागाच्या अधिपत्याखालील मंत्रालय उपाहारगृह, चौरस आहारगृह, विधान भवन उपाहारगृह, मुंबई व कोकण भवन उपाहारगृह, नवी मुंबई येथील उपाहारगृहाच्या कार्यन्वियतेसाठी लागणारा कच्चा माल/वस्तु/साहित्य इत्यादीचा सन २०१६-२०१७ या आर्थिक वर्षात पुरवठा करण्यासाठी संदर्भ क्रमांक १ येथील दि.३०.१०.२०१५ च्या शासन निर्णयातील तरतूदींनुसार संदर्भ क्रमांक २ शासन निर्णयान्वये अनुसूची क्रमांक १० "गाईचे/म्हशीचे दूध" याकरिता प्राप्त झालेल्या निविदा दि.०१.०४.२०१६ ते दि.३१.०३.२०१७ या कालावधीसाठी स्विकृत करण्यात आली आहे. सदर स्विकृत निविदेचा कालावधी दि.३१.०३.२०१७ रोजी संपुष्टात आला आहे. दरम्यानच्या काळात राज्यातील महानगरपालिका व जिल्हा परिषद निवडणूक कार्यक्रमानुसार आचारसंहिता लागू असल्यामुळे व सन २०१७-१८ या कालावधीत उपाहारगृहांसाठी लागणाऱ्या वस्तु, कच्चा माल इत्यादींचा पुरवठा करण्यासाठी निविदा प्रक्रीया राबविण्यास पुरेसा कालावधी उपलब्ध होणार नसल्यामुळे तसेच मंत्रालय व इतर आहार/उपाहारगृह येथील सेवा अत्यावश्यक स्वरुपाची असल्याने व ती कायम चालू राहणे अत्यंत आवश्यक असल्याने दि.०१.०४.२०१७ ते दि.३०.०६.२०१७ या कालावधीमध्ये पुरवठा करण्याच्या कालावधीस मुदतवाढ देण्याची बाब शासनाच्या विचाराधिन होती.

**शासन निर्णय :**

सामान्य प्रशासन विभागाच्या अधिपत्याखालील मंत्रालय उपाहारगृह, चौरस आहारगृह, विधान भवन उपाहारगृह, मुंबई व कोकण भवन उपाहारगृह, नवी मुंबई या चारही आहार/उपाहारगृहांना सन २०१७-२०१८ या वर्षामध्ये लागणारा गाईचे/म्हशीचे दुधाचा पुरवठा करण्याकरीता निविदा प्रक्रीया राबविण्यासाठी काही कालावधी लागणार असल्याने निविदा प्रक्रीया पुर्ण होण्याच्या कालावधीत आवश्यक वस्तुंच्या पुरवठ्याअभावी उपाहारगृहाच्या कामकाजावर विपरीत परिणाम होऊ नये व उपाहारगृहांची सेवा सुरळीत चालू रहावी यासाठी संदर्भ क्रमांक २ येथील शासन निर्णयान्वये मे. यश ॲग्रो फुडस यांना अनुसूची क्रमांक १० मधील "गाईचे/म्हशीचे दुध" चा पुरवठा करण्यासाठी स्विकृत केलेल्या निविदेस दि.०१.०४.२०१७ ते दि.३०.०६.२०१७ या कालावधीसाठी मुदतवाढ देण्यात येत आहे.

२. "गाईचे/म्हशीचे दुध" यांचे बाजारातील दर वाढल्याने दि.०१.०४.२०१६ ते दि.३१.०३.२०१७ या कालावधीसाठी स्विकृत केलेल्या दरामध्ये सदर पुरवठादाराने वाढीव दराची मागणी केली होती. त्या अनुषंगाने मे. यश ॲग्रो फुडस यांना सोबत जोडलेल्या परिशिष्ठ-अ येथील विवरणपत्रातील दरानुसार गाईचे/म्हशीचे दूध पुरवठा करण्यास या शासन निर्णयान्वये मान्यता देण्यात येत आहे.

३. सदर शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आला असून त्याचा संकेतांक क्रमांक २०१७०६०२१६३८५०९५०७ असा आहे. हा शासन निर्णय डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करुन काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने,

Dadasaheb Sopan khatal

Digitally signed by Dadasaheb Sopan khatal
DN: c=IN, o=Government Of Maharashtra, ou=General Administration, postalCode=400032, st=Maharashtra, 2.5.4.20=a310d57c42fb870fa7e7090329a6f40b05dc84ae61a81ed6b863484754bf19f1, cn=Dadasaheb Sopan khatal
Date: 2017.06.02 16:34:59 +05'30'

**(दा. सो. खताळ)**
**महाव्यवस्थापक,**
**मंत्रालय उपाहारगृहे.**

**प्रति,**

१) महालेखाकार-१ (लेखा व अनुज्ञेयता), महाराष्ट्र, मुंबई,
२) महालेखाकार-१ (लेखा परीक्षा), महाराष्ट्र, मुंबई,
३) निवासी लेखा परीक्षा अधिकारी, मुंबई,
४) अधिदान व लेखा अधिकारी, मुंबई,
५) अप्पर कोषागर अधिकारी, कोकण भवन, नवी मुंबई,
६) कोषागार अधिकारी, ठाणे,
७) वित्त विभाग, व्यय-४, मंत्रालय,

**प्रत :**

१) वरिष्ठ भांडारपाल, मंत्रालय उपाहारगृहे,
२) सहा. लेखा परिक्षा अधिकारी, मंत्रालय उपाहरगृहे कार्यालय,
३) सहा. लेखा अधिकारी, मंत्रालय उपाहारगृह/चौरस आहारगृह/विधान भवन उपाहारगृह/कोकण भवन उपाहारगृह,
४) व्यवस्थापक, मंत्रालय उपाहारगृह/चौरस आहारगृह/विधान भवन उपाहारगृह/कोकण भवन उपाहारगृह,
५) भांडारपाल, मंत्रालय उपाहारगृह/चौरस आहारगृह/विधान भवन उपाहारगृह/कोकण भवन उपाहारगृह,
६) संबंधित देयक लेखापाल
७) संबंधित निविदाकार,
८) निवड नस्ती.

परिशिष्ट-अ

(शासन निर्णय क्रमांक : संकीर्ण-२०१७/प्र.क्र.१४४/१७/मंउका, दि. ०२ जून, २०१७ चे सहपत्र)

| अनुसुची क्रमांक-१० गाईचे/म्हशीचे दूध<br>स्विकृत निविदाकार- मे. यश ॲग्रो फुडस<br>वाढीव निविदा कालावधी दि.०१.०४.२०१७ ते दि.३०.०६.२०१७ | | | |
|---|---|---|---|
| अ.क्र. | वस्तुचे नाव | दर<br>रुपये पैसे | प्रमाण प्रति |
| १ | २ | ३ | ४ |
| १ | गाईचे दूध किंवा टोण्ड दूध (३.५ टक्के फॅट व ८.५ टक्के एस.एन.एफ) | ३९.०० | प्रति लिटर |
| २ | म्हशीचे दूध | ४४.५० | प्रति लिटर |